नेमक मधुर । नेमस्त गाणें ॥ १५ ॥ ताल तंबुरे तानमानें । तालबद्ध संतगाणें । तूर्त[1] तार्किकें[2] तनें मनें । तल्लीन होती ॥ १६ ॥ थर्थरां थरकती रोमांच । थै थै थै स्वरें उंच[3] । थिरथिरें थिरावे नाच । प्रेमळ भक्तांचा ॥ १७ ॥ दक्षदाक्षण्य[6] दाटलें । बंदें प्रबंदें कोंदाटलें । दमदम दुमदुमों लागलें । जगदांतर[8] ॥ १८ ॥ धूर्त तूर्त धांवोन आला । धिगबुद्धीनें धिग जाला[9] । धाकें धाकें धोकला । रंग अवघा[10] ॥ १९ ॥ नाना नाटक नेटकें । नाना मानें[11] तुकें[12] कौतुकें । नाना नेमक अनेकें विद्यापात्रें ॥ २० ॥ पाप पळोन गेलें दुरी । पुण्य पुष्कळ प्रगटे वरी । परंतरतो[13] परे अंतरीं । चटक लागे ॥ २१ ॥ फुकट फाकट फटवणें[14] नाहीं । फटकळ फुगडी पिंगा नाहीं[15] । फिकें फसकट फोल नाहीं । भकाध्या[16] निंदा ॥ २२ ॥ बरें बरें बरें ह्मणती । बाबा बाबा उदंड करिती । बळें बळें चि बळाविती । कथेलागीं ॥ २३ ॥ भला भला भला लोकीं । भक्तिभावें भव्य अनेकीं । भूषण भाविक लोकीं । परोपकारें ॥ २४ ॥ मानेल तरी मानावें मनें । मत्त न व्हावें ममतेनें[17] । मी मी मी मी बहुत जनें । ह्मणिजेत आहे ॥ २५ ॥ येके येकां येकापासीं । येऊं येऊं येती झडेसी । या या या या असतयासी[18] । ह्मणावें नलगे[19] ॥ २६ ॥ राग रंग रसाळ

---

१ तत्काळ. २ तर्कज्ञ, बुद्धिवान्. ३ थै थै थै हा नृत्याचा शब्द इतका मोठा होतो कीं तो सर्वांना ऐकूं येतो. ४ मंद मंद. ५ मंद होतो. ६ दक्ष कीर्तनकाराचें कौशल्य. ७ बंद प्रबंद हे गीतभेद आहेत. ८ प्रथम "संगीत गाणें" असें होतें त्याऐवजीं "जगदांतर" असा श्रीसमर्थांचा शोध आहे. ९ दंग झाला. १० जसत जमत सगळा रंग जमला. ११ प्रमाण. १२ मर्यादा. कौतुकयुक्त, मर्यादायुक्त व प्रमाणयुक्त (वागतो). १३ श्रोता परत जातो परंतु अंतरीं चटक लागते. (?) १४ फसविणें. १५ धांगडधिंगा नाहीं. १६ बहकून जाणें व निंदा हीं नाहींत. १७ (स्त्रीपुत्रद्रव्यादिकाच्या) ममतेनें. १८ असें त्यांना किंवा 'असतयासी' ह्मणजे जे आलेले असतात त्यांना. १९ प्रथम "ह्मणिजेत आहे" असें होतें तें खोडून त्या जागीं "ह्मणावें नलगे" हा श्रीसमर्थशोध आहे.

सुरंगें । अंतर संगित रंगें । रत्नपरीक्षा रत्नामागें । धांवती लोकं ॥ २७ ॥ लवलवां लवती लोचन । लकलकां लंकलें मन । लपलपों लपती जन । आवडीनें ॥ २८ ॥ वचनें वाउगीं वदेना । वोंवरेविवरें वसेनां । वगत्रुत्वें निववी जना । विनित होउनी ॥ २९ ॥ सारासार समस्तांला । सिकऊं सिकऊं जनाला । साहित संगित सज्जनाला । बरें वाटे ॥ ३० ॥ खरेंखोटें खरें वाटलें । खर्खर खुर्खुर खुंटलें । खोटें खोटेपणें गेलें । खोटें ह्मणोनियां ॥ ३१ ॥ शाहाणे शोधितां शोधेनां । शास्त्रार्थ श्रुती बोधेना । शुक शारिका शमेनां । शब्द तयाचा ॥ ३२ ॥ हरुषें हरुषें हासिला । हाहा होहोनें भुलला । हित होइना तयाला । परत्रीचें ॥३३॥ लक्षावें लक्षितां अलक्षीं । लक्षिलें लोचनातें लंक्षी । लंगलें लयेंतें अलक्षीं । विहिगममोगें ॥ ३४ ॥ क्षेत्रं[13] क्षेत्रज्ञें क्षोभतो । क्षमेनें क्षमून क्षमवितो । क्षमणें क्षोभणें क्षेत्रज्ञ तो । सर्वां ठाईं ॥ ३५ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे कीर्तनलक्षणनाम समास चतुर्थ ॥ ४ ॥

॥ श्रीराम ॥

मागां हरिकथेचें लक्षण । श्रोतीं केला होता प्रस्न । सावध होऊन विचक्षण । परिसोत आतां ॥ १ ॥ हरिकथा कैसी करावी । रंगें कैसी

---

१ सुंदर गाण्याच्या योगानें अंतर रंगून गेलें. २ रत्नपरीक्षक जसे रत्ना मागें धांवतात (तसे हे कीर्तनपरीक्षक कीर्तनामागें धांवतात.) ३ चकित झालें. ४ वावगें. ५ (अंतःकरणीं) वसेना. ६ शाहाणे शोधून सांपडत नाहींत. ७ समेना, बरोबरीचा होत नाहीं. ८ शुक व सारिका यांच्यानें त्याच्या शब्दाशीं बरोबरी करवत नाहीं, ह्मणजे त्याचा आवाज शुकसारिकांच्या आवाजापेक्षांही गोड असतो. ९ अलक्ष जें ब्रह्म त्याच्याकडे लक्ष ठेवून तें पाहावें. १० पाहाणारे जे लोचन त्यांना हा पाहातो; ह्मणजे त्या लोचनांचा हा पाहाणारा होतो. ११ लागलें. अलक्षीं लय लागला. १२ विहंगममार्गें, एकदम; पिपीलिकामार्ग हळु हळु असतो तसा नव्हे. १३ शरीर. १४ आत्मा. १५ सर्वांठायीं असणारा जो क्षेत्रज्ञ त्याच्या ठिकाणीं क्षमा करणें व क्षोभ पावणें हे दोन्ही धर्म आहेत.

भरावी । जेणें पाविजे पदवी । रघुनाथकृपेची ॥ २ ॥ सोनें आणी परिमळें । युक्षदंडा लागती फळें । गौल्य माधुर्य रसाळें । तरी ते अपूर्वता ॥ ३ ॥ तैसा हरिदास आणी विरक्त । ज्ञाता आणी प्रेमळ भक्त । वित्पन्न आणी वादरहित । तरी हेहि अपूर्वता ॥ ४ ॥ रागज्ञानी ताळज्ञानी । सकळकळा ब्रह्मज्ञानी । निराभिमानें वर्ते जनीं । तरी हेहि अपूर्वता ॥ ५ ॥ मत्सर नाहीं जयासी । जो अत्यंत प्रिये सज्जनासी । चतुरांग जाणे मानसीं । अंतरनिष्ठ ॥६॥ जयंत्यादिकें नाना पर्वें । तीर्थें क्षेत्रें जे अपूर्वें । जेथें वसिजे देवाधिदेवें । सामर्थ्यरूपें ॥७॥ तया तीर्थातें जे न मानिती । शब्दज्ञानें मिथ्या ह्मणती । तया पामरां श्रीपती । जोडेल कैंचा ॥ ८ ॥ निर्गुण नेलें संदेहानें । सगुण नेलें ब्रह्मज्ञानें । दोहिकडे अभिमानें । वोस केलें ॥ ९ ॥ पुढें असतां सगुणमूर्ती । निर्गुणकथा जे करिती । प्रतिपादून उछेदिती । तेचि पढतमूर्ख ॥ १० ॥ ऐसी न कीजे हरिकथा । अंतर पडे उभये पंथा । पारिस लक्षणें आतां । हरिकथेचीं ॥११॥ सगुणमूर्तीपुढें भावें । करुणाकीर्तन करावें । नाना ध्यानें वर्णावें । प्रतापकीर्तीतें ॥ १२ ॥ ऐसें गातां स्वभावें । रसाळ कथा वोढवे । सर्वांतरीं हेलावे । प्रेमसुख ॥ १३ ॥ कथा रचायाची खूण । सगुणीं नाणावें निर्गुण । न बोलावे दोष गुण । पुढिलांचे कदा ॥ १४ ॥ देवाचें वर्णावें वैभव । नाना प्रकारें महत्व । सगुणीं ठेउनियां भाव । हरिकथा करावी ॥ १५ ॥ लाज सांडून जनाची । आस्था सांडून धनाची । नीचें नवी कीर्तनाची । आवडी धरावी ॥ १६ ॥ नम्र होऊन राजांगणीं । निःशंक जावें लोटांगणीं । करताळिका नृत्यवाणी । नामघोषें गर्जावें ॥ १७ ॥ येकांची कीर्ती येकांपुढें । वर्णितां साहित्य न पडे । ह्मणोनियां निवाडे । जेथील तेथें ॥ १८ ॥ मूर्ती नस्तां सगुण ।

---

१ आधींच सोनें इतकें लोकप्रिय आणि त्यांत त्याला सुवास असता, किंवा आधींच इक्षुदंड ( ऊंस ) इतका गोड आणि त्यांत त्याला गोड, मधुर आणि रसाळ अशीं फळें असतीं, तर किती तरी अपूर्व गोष्ट झाली असती. २ नित्य.

श्रवणीं बैसले साधुजन । तरी अद्वैतनिरूपण । अवश्य करावें ॥ १९ ॥ नाहीं मूर्ती नाहीं सज्जन । श्रवणीं बैसले भाविकजन । तरी करावें कीर्तन । प्रस्ताविक वैराग्य ॥ २० ॥ श्रृंगारिक नवरसिक । यामधें सांडावें येक । स्त्रियादिकांचें कौतुक । वर्णू नये कीं ॥ २१ ॥ लावण्य स्त्रियांचें वर्णितां । विकार बाधिजे तत्वता । धारिष्टापासून श्रोता । चळे तत्काळ ॥ २२ ॥ ह्मणउन तें तेजावें । जें बाधक साधकां स्वभावें । घेतां अंतरीं ठसावें । ध्यान स्त्रियांचें ॥ २३ ॥ लावण्य स्त्रियांचें ध्यान । कामाकार जालें मन । कैचें आठवेल ध्यान । ईश्वराचें ॥ २४ ॥ स्त्री वर्णितां सुखावला । लावण्याचे भरीं भरला । तो स्वयें जाणावा चेवला । ईश्वरापासुनी ॥ २५ ॥ हरिकथेसी भावबळें । गेला रंग तो तुंबळें । निमिष्य येक जरी आकळे । ध्यानीं परमात्मा ॥२६॥ ध्यानीं गुंतलें मन । कैचें आठवेल जन । निशंक निर्लज कीर्तन । करितां रंग माजे ॥ २७ ॥ रागज्ञान ताळज्ञान । स्वरज्ञानेंसीं वित्पन्न । अर्थान्वयाचें कीर्तन । करूं जाणे ॥ २८ ॥ छपन्न भाषा नाना कळा । कंठमाधुर्य कोकिळा । परी तो भक्तिमार्ग वेगळा । भक्त जाणती ॥ २९ ॥ भक्तांस देवाचें ध्यान । देवावांचून नेणे अन्न । कळावंतांचें जें मन । तें कळाकार जालें ॥ ३० ॥ श्रीहरिवीण जे कळा । तेचि जाणावी अवकळा । देवास सांडून वेगळा । प्रत्यक्ष पडिला ॥ ३१ ॥ सर्पी वेढिलें चंदनासी । निधानीं आड विवसी । नाना कळा देवासी । आड तैस्या ॥ ३२ ॥ सांडून देव सर्वज्ञ । नादामध्यें व्हावें मग्न । तें प्रत्यक्ष विघ्न । आडवें आलें ॥ ३३ ॥ येक मन गुंतलें स्वरीं । कोणें चिंतावा

---

१ पश्चात्तापयुक्त. २ त्यजावें. ३ कोणत्याही कारणानें कथेमध्यें रसभंग झाला असला, तरी जर क्षणभर परमात्मा ध्यानांत येईल तर गेलेला रंग पुन्हां यईल. ४ आन, दुसरें. ५ गवयी वगैरे जे कलावंत लोक असतात त्यांचें लक्ष गाण्याच्या विषयाकडे न जातां आलापादि बाह्य स्वरूपानेंच वेधलें जातें. ६ द्रव्याच्या आड. ७ भूत, पिशाच्च.

श्रीहरी । बळेंचि धरुनियां चोरीं । शिश्रूषा[1] घेतली ॥ ३४ ॥ करितां देवाचें दर्शन । आडवें आलें रागज्ञान । तेणें धरुनियां मन । स्वरामागें नेलें ॥ ३५ ॥ भेटों जातां राजद्वारीं । बळेंचि धरिला वेगारी । कळावंतां तैसी परी । कळेनें केली ॥ ३६ ॥ मन ठेऊन ईश्वरीं । जो कोणी । हरिकथा करी । तोचि ये संसारीं । धन्य जाणा ॥ ३७ ॥ जयास हरिकथेची गोडी । उठे नीच नवी आवडी । तयास जोडली जोडी । सर्वोत्तमाची ॥ ३८ ॥ हरिकथा मांडली जेथें । सर्व सांडून धावें तेथें । आलस्य निद्रा दवडून स्वार्थें । हरिकथेसि सादर ॥ ३९ ॥ हरिभक्तांचिये घरीं । नीचकृत्य अंगीकारी । साहेभूत[3] सर्वांपरी । साक्षपें होये ॥ ४० ॥ या नाव हरिदास । जयासि नामीं विश्वास । येथून हा समास । संपूर्ण जाला ॥४१॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे हरिकथालक्षणनिश्चयनाम समास पंचम ॥ ५ ॥

॥ श्रीराम ॥

रूप लावण्य अभ्यासितां नये । सहजगुणास न चले उपाये । कांहीं तरी धरावी सोये । अगांतुक गुणाची ॥ १ ॥ काळें माणुस गोरें होयेना । वनाळासें[4] येत्न चालेना । मुक्यास वाचा फुटेना । हा सहज गुण ॥ २ ॥ आंधळें डोळस होयेना । बधिर तें ऐकेना । पांगुळ पाये घेइना । हा सहज गुण ॥ ३ ॥ कुरूपतेचीं लक्षणें । किती ह्मणोनि सां-

---

१ शुश्रूषा. २ जसें चोरानें बळेंच एकाद्याला पकडून त्याच्यापासून चाकरी घ्यावी, त्याप्रमाणें तालसुराकडे पूर्णपणें लक्ष ठेवून करुणाकीर्तन करणारांच्या मनाचें होय. तें मन असतें स्वराकडे व मुखानें कीर्तन चाललें असतें श्रीहरीचें! ३ साह्यभूत. ४ वनाळ ह्मणजे स्वभाव असा अर्थ कोणी देतात व कोणी वनाळ ह्मणजे रानवट, अडाणी असा अर्थ करितात; परंतु हे दोन्ही अर्थ इष्ट दिसत नाहींत; कारण प्रयत्नानें स्वभाव पालटतो व रानवट सुधारतो. या शब्दाच्या अर्थांत कांहींतरी सहजगुणाचा अंतर्भाव असला पाहिजे; तेव्हां याचा अर्थ काय करावा ?

गणें। रूप लावण्य याकारणें। पालटेना ॥ ४ ॥ अवगुण सोडितां जाती। उत्तम गुण अभ्यासितां येती। कुविद्या सांडून सिकती। शाहाणे विद्या ॥ ५ ॥ मूर्खपण सांडितां जातें। शाहाणपण सिकतां येतें। कारबार करितां उमजतें। सकळ कांहीं ॥ ६ ॥ मान्यता आवडे जीवीं। तरी कां उपेक्षा करावी। चातुर्येंविण उंच पदवी। कदापी नाहीं ॥ ७ ॥ ऐसी प्रचित येते मना। तरी कां स्वहित कराना। सन्मार्गें चालतां जना। सज्जना माने ॥ ८ ॥ देहे नेटकें श्रुंगारिलें। परी चातुर्येंविण नासलें। गुणेंविण साजिरें केलें। बाष्कळ जैसें ॥ ९ ॥ अंतर्कळा श्रुंगारावी। नानापरी उमजवावी। संपदा मेळऊन भोगावी। सावकास ॥ १० ॥ प्रेत्न करीना सिकेना। शरीर तेंहि कष्टवीना। उत्तम गुण घेईना। सदाकोपी ॥ ११ ॥ आपण दुसऱ्यास करावें। तें उसिणें सवेंचि घ्यावें। जना कष्टवितां कष्टावें। लागेल बहु ॥१२॥ न्यायें वर्तेल तो शाहाणा। अन्याइ तो दैन्यवाणा। नाना चातुर्याच्या खुणा। चतुर जाणे ॥ १३ ॥ जें बहुतांस मानलें। तें बहुतीं मान्य केलें। येर तें वेर्थचि गेलें। जगनिंद्य ॥ १४ ॥ लोक आपणासि वोळावे। किंवा आवघेच कोंसळावे। आपणास समाधान फावे। ऐसें करावें ॥ १५ ॥ समाधानें समाधान वाढे। मित्रिनें मित्रि जोडे। मोडितां क्षणमात्रें मोडे। बरेपण ॥ १६ ॥ अहो कांहो अरे कां रे। जनीं ऐकिजेतें किं रे। कळत असतांच कां रे। निकामीपण ॥ १७ ॥ चातुर्यें श्रुंगारे-अंतर। वस्त्रें श्रुंगारें शरीर। दोहिमधें कोण थोर। बरें पाहा ॥ १८ ॥ बाह्याकार श्रुंगारिलें। तेणें लोकांच्या हातासि काये आलें। चातुर्यें बहुतांसी रक्षिलें। नानाप्रकारें ॥ १९ ॥ बरें खावें बरें जेवावें। बरें ल्यावें बरें नेसावें। समस्तीं बरें ह्मणावें। ऐसी वासना ॥ २० ॥ तनें मनें झिजावें।

---

१ प्रथम "उत्तम वोलोंहि सिकेना" असें चरण होतें त्याचें श्रीसमर्थांनीं स्वहस्तें "उत्तम गुण घेईना" असें केलें. २ लोक आपल्या बाजूला वळावे कीं त्यांनीं आपणावर उलटून पडावें असें तुह्मांस वाटतें?

तेणें भले ह्मणोन घ्यावें । उगेंचि कल्पितां सिणावें । लागेल पुढें ॥२१॥ लोकीं कार्यभाग आडे । तो कार्यभाग जेथें घडे । लोक सहजचि वोढे । कामासाठीं ॥ २२ ॥ ह्मणोन दुसऱ्यास सुखी करावे । तेणें आपण सुखी व्हावें । दुसऱ्यास कष्टवितां कष्टावें । लागेल स्वयें ॥ २३ ॥ हें तों प्रगटाचि आहे । पाहिल्याविण कामा नये । समजणें हा उपाये । प्राणीमात्रांसी ॥ २४ ॥ समजले आणी वर्तले । तेचि भाग्यपुरुष जाले । यावेगळे उरले । ते करंटे पुरुष ॥ २५ ॥ जितुका व्याप तितुकें वैभव । वैभवासारिखा हावभाव । समजलें पाहिजे उपाव । प्रगटाचि आहे ॥ २६ ॥ आळसें कार्यभाग नासतो । साक्षेप होत होत होतो । दिसंते गोष्टी कळेना तो । शाहाणा कैसा ॥ २७ ॥ मैत्रि करितां होतें कृत्य । वैर करितां होतो मृत्य । बोलिलें हें सत्य किं असत्य । वोळखावें ॥ २८ ॥ आपणास शाहाणे करूं नेणे । आपलें हित आपण नेणे । जनीं मित्रि राखों नेणे । वैर करी ॥ २९ ॥ ऐसे प्रकारींचे जन । त्यास ह्मणावें अज्ञान । तयापासीं समाधान । कोण पावे ॥ ३० ॥ आपण येकायेकी येकला । सृष्टींत भांडत चालिला । बहुतांमध्यें येकल्याला । येश कैचें ॥ ३१ ॥ बहुतांचें मुखीं उरावें । बहुतांचे अंतरीं भरावें । उत्तम गुणीं विवरावें । प्राणीमात्रांसी ॥ ३२ ॥ शाहाणे करावे जन । पतित करावे पावन । सृष्टिमधें भगवद्भजन । वाढवावें ॥ ३३ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे चातुर्यलक्षणनाम समास षष्ठ ॥ ६ ॥

**॥ श्रीराम ॥**

**ना**ना वेश नाना आश्रम । सर्वांचें मूळ गृहस्थाश्रम । जेथें पावती विश्राम । त्रैलोक्यवासी ॥ १ ॥ देव ऋषी मुनी योगी । नाना तापसी वीतरागी । पितृआदिकरून विभागी । अतीत अभ्यागत ॥ २ ॥ गृहस्थाश्रमीं निर्माण जाले । आपला आश्रम टाकून गेले । परंतु गृहस्थागृहीं

---

१ प्रत्यक्ष.

हिंडों लागले । कीर्तिरूपें ॥ ३ ॥ याकारणें गृहस्थाश्रम । सकळामधें उत्तमोत्तम । परंतु पाहिजे स्वधर्म । आणी भूतदया ॥ ४ ॥ जेथें शड्-कर्में[1] चालती । विध्योक्त क्रिया आचरती । वाग्माधूर्यें बोलती । प्राणी-मात्रांसी ॥ ५ ॥ सर्वप्रकारें नेमक । शास्त्रोक्त करणें कांहींयेक । त्याहि-मध्यें अलोलिक । तो हा भक्तिमार्ग ॥ ६ ॥ पुरश्चरणी कायाक्लेसी । दृढ-व्रती परम सायासी । जगदीशावेगळें जयासी । थोर नाहीं ॥ ७ ॥ काया वाचा जीवें प्राणें । कष्टे भगवंताकारणें । मनें घेतलें धरणें । भजनमार्गी ॥ ८ ॥ ऐसा भगवंताचा भक्त । विशेष अंतरीं विरक्त । संसार सांडून जाला मुक्त । देवाकारणें ॥ ९ ॥ अंतरापासून वैराग्य । तेंचि जाणावें महद्भाग्य । लोलंगतेयेवढें अभाग्य । आणीक नाहीं ॥ १० ॥ राजे राज्य सांडून गेले । भगवंताकारणें हिंडले । कीर्तिरूपें पावन जाले । भूमंडळीं ॥ ११ ॥ ऐसा जो कां योगेश्वर । अंतरीं प्रत्य-याचा विचार । उकलूं जाणे अंतर । प्राणीमात्राचें ॥ १२ ॥ ऐसी वृत्ति उदासीन । त्याहिवरी विशेष आत्मज्ञान । दर्शनमात्रें समाधान । पावती लोक ॥ १३ ॥ बहुतांसी करी उपाये । तो जनाच्या वाट्या नें[2]ये । अखंड जयाचे हृदये । भगवद्रूप ॥ १४ ॥ जनास दिसे हा दुश्चि-त । परी तो आहे सावचित । अखंड जयाचें चित्त । परमेश्वरीं ॥ १५ ॥ उपासनामूर्तिध्यानीं[3] । अथवा आत्मानुसंधानीं । नाहीं तरी श्रवणमननीं । निरंतर ॥ १६ ॥ पूर्वजांच्या पुण्य कोटी । संग्रह असिल्यां गांठीं । तरीच ऐसीयाची भेटी । होये जनासी ॥ १७ ॥ प्रचीतिविण जें ज्ञान । तो आवघाचि अनुमान । तेथें कैचें परत्रसाधन । प्राणीयांसी ॥ १८ ॥ याकारणें मुख्य प्रत्यये । प्रचीतिविण कामा नये । उपायासारिखा अपा-ये । शाहाणे जाणती ॥ १९ ॥ वेडें संसार सांडून गेलें । तरी तें कष्ट-कष्टेंचि मेलें । दोहिकडे अंतरलें । इहलोक परत्र ॥ २० ॥ रागें रागें

---

१ षट्कर्में. २ जो पुष्कळांच्या उपयोगीं पडतो, तो सर्वांच्या वांट्याला येत नाहीं. ३ ज्याचें चित्त उपासनामूर्तीच्या ध्यानामध्यें मग्न असतें.

निघोन गेला । तरी तो भांडभांडेंचि मेला । बहुत लोक कष्टी केला । आपणहि कष्टी ॥ २१ ॥ निघोन गेला परी अज्ञान । त्याचे संगतीं लागले जन । गुरु शिष्य दोघे समान । अज्ञानरूपें ॥ २२ ॥ आशाबद्धि अनाचारी । निघोन गेला देशांतरीं । तरी तो अनाचारचि करी । जनामधें ॥ २३ ॥ गृहीं पोटेंविण कष्टती । कष्टी होऊन निघोन जाती । त्यास ठाईं ठाईं मारिती । चोरी भरतां ॥ २४ ॥ संसार मिथ्या ऐसा कळला । ज्ञान समजोन निघोन गेला । तेणें जन पावन केला । आपणाऐसा ॥ २५ ॥ येके संगतीनें तरती । येके संगतीनें बुडती । याकारणें सत्संगती । बरी पाहावी ॥ २६ ॥ जेथें नाहीं विवेकपरीक्षा । तेथें कैंची असेल दीक्षा । घरोबरीं मागतां भिक्षा । कोठेंहि मिळेना ॥ २७ ॥ जो दुसऱ्याचें अंतर जाणे । देशकाळ प्रसंग जाणे । तया पुरुषा काये उणें । भूमंडळीं ॥ २८ ॥ नीच प्राणी गुरुत्व पावला । तेथें आचारचि बुडाला । वेदशास्त्रब्राह्मणाला । कोण पुसे ॥ २९ ॥ ब्रह्मज्ञानाचा विचारु । त्याचा ब्राह्मणासीच अधिकारु । वर्णानां ब्राह्मणो गुरुः । ऐसें वचन ॥३०॥ ब्राह्मण बुद्धीपासून चेवले । आचारापासून भ्रष्टले । गुरुत्व सांडून जाले । शिष्य शिष्यांचे ॥ ३१ ॥ कित्येक दावलमलकास[1] जाती । कित्येक पीरास भजती । कित्येक तुरुक होती । आपले इछेनें ॥ ३२ ॥ ऐसा कलयुगींचा आचार । कोठें राहिला विचार । पुढें पुढें वर्णसंकर होणार आहे ॥ ३३ ॥ गुरुत्व आलें नीचयाती । कांहींयेक वाढली महंती । शूद्र आचार बुडविती । ब्राह्मणाचा ॥ ३४ ॥ हें ब्राह्मणास कळेना । त्याची वृत्तिच वळेना । मिथ्या अभिमान गळेना । मूर्खपणाचा ॥ ३५ ॥ राज्य नेलें म्लेंछीं क्षेत्रीं । गुरुत्व नेलें कुपात्रीं । आपण अरत्रीं ना परत्रीं । कांहींच नाहीं ॥ ३६ ॥ ब्राह्मणास ग्रामणीनें[2]

---

१ दावलमल्ल ह्मणून मुसलमानांत एक अवलिया होऊन गेला त्याचे अनुयायी ते दावलमलीक. २ ग्रामण्यानें.

बुडविलें । विष्णूनें श्रीवत्स मिरविलें । त्याच विष्णूनें श्रापिलें । फरश-रामें ॥ ३७ ॥ आह्मीहि तेचि ब्राह्मण । दुःखें बोलिलें हें वचन । वडिल गेले ग्रामणी करून । आह्मांभोंवते ॥ ३८ ॥ आतांचे ब्राह्मणीं काये केलें । अन्न मिळेना ऐसें जालें । तुह्मा बहुतांचे प्रचितीस आलें । किंवा नाहीं ॥ ३९ ॥ बरें वडिलांस काये ह्मणावें । ब्राह्मणाचें अदृष्ट जाणावें । प्रसंगें बोलिलें स्वभावें । क्षमा केले पाहिजे ॥४॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे युगधर्मनिरूपणनाम सामास सप्तम ॥ ७ ॥

॥ श्रीराम ॥

बरें ऐसा प्रसंग जाला । जाला तो होऊन गेला । आतां तरी ब्राह्मणीं आपणाला । शाहाणे करावें ॥ १ ॥ देव पुजावा विमळहस्तीं । तेणें भाग्य पाविजे समस्तीं । मूर्ख अभक्त वेस्ती । दरिद्र भोगिजे ॥२॥ आधीं देवास वोळखावें । मग अनन्यभावें भजावें । अखंड ध्यानचि धरावें । सर्वोत्तमाचें ॥ ३ ॥ सर्वांमधें जो उत्तम । तया नाव सर्वोत्तम । आत्मानात्मविवेकवर्म । ठाईं पाडावें ॥ ४ ॥ जाणजाणों देह रक्षी । आत्मा द्रष्टा अंतरसाक्षी । पदार्थमात्रास परीक्षी । जाणपणें ॥ ५ ॥ तो सकळ देहामधें वर्ततो । इंद्रियेग्राम चेष्टवितो । प्रचितीनें प्रत्यये येतो । प्राणीमात्रीं ॥ ६ ॥ प्राणीमात्रीं जगदांतरें । ह्मणोन राखावीं अंतरें । दाता भोक्ता परस्परें । सकळ कांहीं ॥ ७ ॥ देव वर्ततो जगदांतरीं । तोचि आपुले अंतरीं । त्रैलोकींचे प्राणीमात्रीं । बरें पाहा ॥ ८ ॥ मुळीं पाहाणार तो येकला । सकळां ठाईं विभागला । देहप्रकृतीनें जाला । भिन्न भिन्न ॥ ९ ॥ भिन्न भासे देहाकारें । प्रस्तुत येकचि अंतरें । बोलणें चालणें निर्धारें । त्यासीच घडे ॥ १० ॥ आपुले पारिखे सकळ

---

१ ज्या विष्णूनें ब्राह्मणाकरितां श्रीवत्स मिरविलें त्याच विष्णूनें परशुराम अवतारांत ब्राह्मणाला शाप दिला. २ जगदंतर जो परमेश्वर तो प्राणिमात्रीं आहे ह्मणून.

लोक । पक्षी स्वापद पश्वादिक । किडा मुंगी देहधारक । सकळ प्राणी ॥ ११ ॥ खेचर भूचर वनचर । नानाप्रकारें जळचर । चत्वार खाणी विस्तार । किती ह्मणोन सांगावा ॥ १२ ॥ समस्त जाणीवेनें वर्तती । रोकडी पाहावी प्रचिती । त्याची आपुली संगती । अखंड आहे ॥ १३ ॥ जगदांतरें वोळला धणी । किती येकवटील प्राणी । परी ते वोळायाची करणी । आपणांपासीं ॥ १४ ॥ हें आपणाकडेच येतें । राजी राखिजे समस्तें । देहासि बरें करावें तें । आत्मयांस पावे ॥ १५ ॥ दुर्जन प्राणी त्यांतील देव । त्याचा लाताड स्वभाव । रागास आला जरी राव । तरी तंडों नये कीं ॥ १६ ॥ प्रसंगीं सांडीच करणें । पुढें विवेक विवरणें । विवेकें सज्जनचि होणें । सकळ लोकीं ॥ १७ ॥ आत्मत्वीं दिसतो भेद । हा अवघाचि देहसमंध । येका जीवनें नाना स्वाद । औषधीभेदें ॥ १८ ॥ गरळ आणि अमृत जालें । परी आपपण नाहीं गेलें । साक्षत्वें आत्मयांस पाहिलें । पाहिजे तसें ॥ १९ ॥ अंतरनिष्ठ जो पुरुष । तो अंतरनिष्ठेनें विशेष । जगामधें जो जगदीश । तो तयास वोळखे ॥ २० ॥ नयनेंचि पाहावा नयेन । मनें शोधावें मन । तैसाचि हा भगवान् । सकळां घटीं ॥ २१ ॥ तेणेंविण कार्यभाग आडे । सकळ कांहीं तेणेंचि घडे । प्राणी विवेकें पवाडे । तेणेंचि योगें ॥ २२ ॥ जागृतीस व्यापार घडतो । समंध तयासीच पडतो । स्वप्नामधें घडे जो तो । येणेंचि न्यायें ॥ २३ ॥ अखंड ध्यानाचें लक्षण । अखंड देवाचें स्मरण । याचें कळतां विवरण । सहजचि घडे ॥ २४ ॥ सहज सांडून सायास । हाचि कोणीयेक दोष । आत्मा सांडून अनात्म्यास । ध्यानीं धरिती ॥ २५ ॥ परी तें धरितांहि धरेना । ध्यानीं

---

१ जगदंतर परमात्मा आपलासा झाला तर कितीतरी प्राणी एकवटणार आहेत; आणि तो प्राप्त करून घेण्याची गोष्ट आपल्याच हातीं आहे. २ सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणीं परमेश्वर आहे तसा तो आपणांतही आहे; तेव्हां आपण इतरांचें अंतर जाणावयाचें याचा अर्थ असा होतो कीं सर्व घटीं असणारा भगवान् भगवानानेंच पाहावयाचा आहे.

येति वेक्ति नाना । उगोंचि कष्टती मना । कासाविस करूनी ॥ २६ ॥ मूर्तीध्यान करितां सायासें । तेथें येकाचें येकाचि दिसे । भासों नये तेंचि भासे । विलक्षण ॥ २७ ॥ ध्यान देवाचें करावें । किंवा देवाल्याचें करावें । हेंचि बरें विवरावें । आपले ठाईं ॥ २८ ॥ देह देउळ आत्मा देव । कोठें धरूं पाहातां भाव । देव वोळखोन जीव । तेथेंचि लावावा ॥ २९ ॥ अंतरनिष्टा ध्यान ऐसें । दंडकध्यान अनारिसें । प्रत्ययेंविण सकळ पिसें । अनुमानध्यान ॥ ३० ॥ अनुमानें अनुमान वाढे । ध्यान धरितां सर्वेचि मोडे । उगेचि कष्टती बापुडे । स्थूळध्यानें ॥ ३१ ॥ देवास देहधारी कल्पिती । तेथें नाना विकल्प उठती । भोगणें त्यागणें विपत्ति । देहयोगें ॥ ३२ ॥ ऐसें मनीं आठवतें । विचारितां भलतेंचि होतें । दिसों नये तें दिसतें । नाना स्वप्नीं ॥ ३३ ॥ दिसतें तें सांगतां नये । बळें भावार्थ धरितां नये । साधक कासाविस होये । अंतर्यामीं ॥ ३४ ॥ सांगोपांग घडे ध्यान । त्यास साक्ष आपुलें मन । मनामध्यें विकल्पदर्शन । होऊंच नये ॥ ३५ ॥ फुटक मन येकवटिलें । तेणें तुटक ध्यान केलें । तेथें कोण सार्थक जालें । पाहाना कां ॥ ३६ ॥ अखंड ध्यानें न घडे हित । तरी तो जाणावा पतित । हाचि अर्थ सावचित । बरा पाहावा ॥ ३७ ॥ ध्यान धरितें तें कोण । ध्यानीं आठवतें तें कोण । दोनीमध्यें अनन्यलक्षण । असिलें पाहिजे ॥ ३८ ॥ अनन्य सहजचि आहे । साधक शोधून न पाहे । ज्ञानी तो विवरोन राहे । समाधानें ॥ ३९ ॥ ऐसीं हे प्रत्ययाचीं कामें । प्रत्ययेंविण बाधिजे भ्रमें । लोकदंडकसंभ्रमें[1] । चालती प्राणी ॥४०॥ दंडकध्यानाचें लक्षण । धरून बैसलें अवलक्षण । प्रमाण आणि अप्रमाण । बाजारी नेणती ॥ ४१ ॥ मिथ्या समाचार उठवितीं । वाउग्याच बोंबा घालिती । मनास आणितां अंतीं । आवघेंचि मिथ्या ॥४२॥ कोणीयेक ध्यानस्त बैसला । कोणीयेक सिकवी

---

१ सामान्य लोकांचें, रूढीचें ध्यान तें वेगळें.

त्याला । मुकुट काढूनि माळ घाला । ह्मणिजे वेरें ॥ ४३ ॥ मनाचेथें काये दुष्काळ । जे आखुड कल्पिली माळ । सांगते ऐकते केवळ । मूर्ख जाणावे ॥ ४४ ॥ प्रत्यक्ष कष्ट करावे न लगती । दोरे फुलें गुंफावी न लगती । कल्पनेचि माळ थिटी करिती । काये निमित्य ॥ ४५ ॥ बुद्धीविण प्राणी सकळ । ते ते अववेचि बाष्कळ । तया मूर्खासीं खळखळ । कोणें करावी ॥ ४६ ॥ जेणें जैसा परमार्थ केला । तैसाच पृथ्वीवरी दंडक चालिला । साता पांचाचा बळावला । साभिमान ॥ ४७ ॥ प्रत्ययेंविण साभिमान । रोगी मारिले झांकून । तेथें अववाचि अनुमान । ज्ञान कैचें ॥ ४८ ॥ सर्व साभिमान सांडावा । प्रत्ययें विवेक मांडावा । माया पूर्वपक्ष खंडावा । विवेकवळें ॥ ४९ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे अखंडध्याननिरूपणनाम समास आठवा ॥ ८ ॥

॥ श्रीराम ॥

पिंडाचें पाहिलें कौतुक । शोधिला आत्मानात्मा विवेक । पिंड अनात्मा आत्मा येक । सकळ कर्ता ॥ १ ॥ आत्म्यास अनन्यता बोलिली । ते विवेकें प्रत्यया आली । आतां पाहिजे समजली । ब्रह्मांडरचना ॥२॥ आत्मानात्मा विवेक पिंडीं । सारासारविचार ब्रह्मांडीं । विवरविवरों हे गोडी । घेतली पाहिजे ॥ ३ ॥ पिंड कार्य ब्रह्मांड कारणें । याचें करावें विवरण । हेंचि पुढें निरूपण । बोलिलें असे ॥ ४ ॥ असार ह्मणिजे नासिवंत । सार ह्मणिजे तें शाश्वत । जयास होईल कल्पांत । तें सार नव्हे ॥ ५ ॥ पृथ्वी जळापासून जाली । पुढें ते जळीं मिळाली । जळाची उत्पत्ति वाढली । तेजापासूनी ॥ ६ ॥ तें जळ तेजें शोषिलें ।

---

१ कोणी एक मनुष्य स्थूल मूर्ति मनांत आणून मानसपूजा करित असतां मूर्तीच्या मस्तकीं मुकुट असल्यामुळें फुलांची माळ गळ्यांत जाईना, तेव्हां दुसरा कोणी ह्मणतो कीं मुकुट काढून माळ घाला. २ ब्रह्मांड=पंचभूतें. तेव्हां हीं पंचभूतें हें कारण व त्यांचेपासून पिंड हें कार्य बनलें आहे. ३ प्रथम "निमाली" होतें त्याचें "मिळाली" केलें आहे.

महत्तेजें आटोन गेलें । पुढें तेजचि उरलें । सावकाश ॥ ७ ॥ तेज जालें वायोपासुनी । वायो झडपी तयालागुनी । तेज जाऊन दाटणी । वायोचीच जाली ॥ ८ ॥ वायो गगनापासूनी जाला । मागुतां तेथेंचि विराला । ऐसा हा कल्पांत बोलिला । वेदांतशास्त्रीं ॥ ९ ॥ गुणमाया मूळमाया । परब्रह्मीं पावती लया । तें परब्रह्म विवराया । विवेक पाहिजे ॥ १० ॥ सर्व उपाधीचा सेवट । तेथें नाहीं दृश्य खटपट । निर्गुण ब्रह्म घनदाट । सकळां ठाईं ॥ ११ ॥ उदंड कल्पांत जाला । तरी नाश नाहीं तयाला । मायात्यागें शाश्वताला । वोळखावें ॥ १२ ॥ देव अंतरात्मा सगुण । सगुणें पाविजे निर्गुण । निर्गुणज्ञानें विज्ञान[1] । होत असे ॥ १३ ॥ कल्पनेतीत जें निर्मळ । तेथें नाहीं मायामळ । मिथ्यत्वें दृश्य सकळ । होत जातें ॥ १४ ॥ जें होतें आणी सवेंचि जातें । तें तें प्रत्ययास येतें । जेथें होणें जाणें नाहीं तें । विवेकें वोळखावें ॥ १५ ॥ येक ज्ञान येक अज्ञान । येक जाणावें विपरीत ज्ञान । हे त्रिपुटी होये क्षीण । तेंचि विज्ञान[2] ॥ १६ ॥ वेदांत सिद्धांत धादांत । याची पाहावी प्रचित । निर्विकार सदोदित । जेथें तेथें ॥ १७ ॥ तें ज्ञानदृष्टीनें पाहावें । पाहोन अनन्य राहावें । मुख्य आत्मनिवेदन जाणावें । याचें नाव ॥ १८ ॥ दृश्यास दिसतें दृश्य । मनास भासतो भास । दृश्यभासातीत अविनाश । परब्रह्म तें ॥ १९ ॥ पाहों जातां दुरीच्या दुरी । परब्रह्म सबाहेअंतरीं । अंतचि नाहीं अनंत सरी । कोणास द्यावी ॥ २० ॥ चंचळ तें स्थिरावेना । निश्चळ तें कदापी चळेना । आभाळ येतें जातें गगना । चळण नाहीं ॥ २१ ॥ जें विकारें वाढे मोडे । तेथें शाश्वतता कैंची घडे । कल्पांत होतांच विघडे । सकळ कांहीं ॥ २२ ॥ जें अंतरींच भ्रमलें । मायासंभ्रमें संभ्रमलें । तयास हें कैसें उकलें । आ-

---

१ प्रथम " सगुणज्ञानें निर्गुण " असें चरण होतें त्याचें " निर्गुणज्ञानें विज्ञान " असें केलें आहे. २ प्रथम " ज्ञान " होतें त्याचें " विज्ञान " केलें.

व्हाट चक्र ॥ २३ ॥ भिडेनें वेव्हार निवडेना । भिडेनें सिद्धांत कळेना । भिडेनें देव आकळेना । अंतर्यामीं ॥ २४ ॥ वैद्याची प्रचित येईना । आणि भीडहि उलंघेना । तरी मग रोगी वांचेना । ऐसें जाणावें ॥२५॥ जेणें राजा वोळखिला । तो राव ह्मणेना भलत्याला । जेणें देव वोळखिला । तो देवरूपी ॥ २६ ॥ जयास माईकाची भीड । तें काय बोलेल द्वाड । विचार पाहातां उघड । सकळ कांहीं ॥ २७ ॥ भीड मायेऐलीकडे । परब्रह्म तें पैलीकडे । पैलीकडे ऐलीकडे । सदोदित ॥ २८ ॥ लटिक्याची भीड धरणें । भ्रमें भलतेंचि करणें । ऐसीं नव्हेती लक्षणें । विवेकाचीं ॥ २९ ॥ खोटें आवघेंचि सांडावें । खरें प्रत्ययें वोळखावें । मायात्यागें समजावें । परब्रह्म ॥ ३० ॥ ते मायेचें जें लक्षण । तेंचि पुढें निरूपण । सुचितपणें विवरण । केलें पाहिजे ॥ ३१ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे शाश्वतनिरूपणनाम समास नवम ॥ ९ ॥

॥ श्रीराम ॥

**माया** दिसे परी नासे । वस्तु न दिसे परी न नासे । माया सत्य वाटे परी मिथ्या असे । निरंतर ॥ १ ॥ करंटा पडोनी उताणा । करी नानापरी कल्पना । परी तें कांहींच घडेना । तैसी माया ॥ २ ॥ द्रव्यदारेचें स्वप्नवैभव । नाना विळासें हावभाव । क्षणीक वाटे परी माव । तैसी माया ॥ ३ ॥ गगनीं गंधर्वनगरें । दिसताती नानाप्रकारें । नाना रूपें नाना विकारें । तैसी माया ॥ ४ ॥ लक्षुमी रायेविनोदाची । वोंळतां वाटे साची । मिथ्या प्रचित तेथींची । तैसी माया ॥ ५ ॥ दसऱ्याचे सुवर्णाचे लाटे । लोक ह्मणती परी ते कांटे । परी सर्वत्र राहाटे । तैसी माया ॥ ६ ॥ मेल्याचा मोहोत्साव करणें । सतीचें वैभव वाढ-

---

१ अफाट. २ रायविनोदी, बहुरूपी. ३ बहुरूप्याचें वैभव जसें वस्तुतः मिथ्या असतें तशी माया होय.

वणें । मसणीं जाउनी रुदन करणें । तैसी माया ॥ ७ ॥ राखेसी ह्मणती लक्ष्मी । दुसरी भारदोरी[1] लक्ष्मी । तिसरी नाममात्र लक्ष्मी । तैसी माया ॥ ८ ॥ मुळीं बाळविधवा नारी । तिचें नांव जन्मसावित्री । कुबेर हिंडे घरोघरीं । तैसी माया ॥ ९ ॥ दशअवतारांतील कृष्णा । उपजे जीर्ण वस्त्राची तृष्णा[2] । नदी नामें पीयुष्णा[3] । तैसी माया ॥१०॥ बहुरूपांतील रामदेराव[4] । ग्रामस्तांपुढें दाखवी हावभाव । कां महाराज ह्मणोनी लाघव[5] । तैसी माया ॥ ११ ॥ देव्हारां असे अनपूर्णा । आणी गृहीं अन्नचि मिळेना । नामें सरस्वती सिकेना । शुभावळु[6] ॥ १२ ॥ सुण्यासँ[7] व्याघ्र[8] नाम ठेविलें । पुत्रास इंद्रनामें पाचारिलें । कुरूप परी आळविलें । सुंदरा ऐसें ॥ १३ ॥ मूर्ख नामें सकळकळा । राशभी नामें कोकिळा । नातरी डोळसेचा डोळा । फुटका जैसा ॥ १४ ॥ मातांगी[9]चें नाम तुळसी । चँर्मिकी[10]चें नाम कासी । बोलती अतिशूद्रिणीसी । भागीरथी ऐसें ॥ १५ ॥ साउली आणी अंधकार । येक होतां तेथीचा विचार । उगाचि दिसे भासमात्रें[11] । तैसी माया ॥ १६ ॥ श्रवण बोटें संधी करतळ । रविरश्मे दिसती इंगळ । रम्य आरक्त[12]कल्होळ । तैसी माया ॥ १७ ॥ भगवें वस्त्र देखतां मनाला । वाटे अग्नचि लागला । विवंचितां प्रत्ये आला । तैसी माया ॥ १८ ॥ जळीं चरणकरांगुळें । आखुड लांबें किरकोळें । विपरीत कोँण[13] दिसती जळें । तैसी माया ॥ १९ ॥ भोवंडीनें पृथ्वी कळथली । कामीणी[14]नें पिवळी जाली । सन्य-

---

१ गर्भ गलित न व्हावा ह्मणून स्त्रिया कमरेला भारलेली दोरी बांधतात ती. २ दशावताराच्या नाटकांत कृष्णाचें सोंग घेणाराला फाटक्या तुटक्या वस्त्राची जशी इच्छा असते. ३ पयोष्णी, अमृताची नदी. ४ रामाचें रूप धारण करणारा बहुरूपी; किंवा, ( रामदेराव=शूर पुरुष ) शूर पुरुषाचें सोंग आणणारा बहुरूपी. ५ महाराज ह्मणवून घेऊन अंगीं लघुत्व असणें. ६ नांव सरस्वती असून शिकत नाहीं तर शुभा वळु ( गोंवऱ्या थापते ). ७ कुत्र्याला. ८ वाघ्या. ९ मांगिणीचें. १० चांभारणीचें. ११ अंधारांतील सावली जशी भासमात्र असते. १२ लाल गोळा. १३ वांकडीं. १४ काविळीच्या योगानें.

पातस्थां अनुभवली । तैसी माया ॥ २० ॥ कोणीयेक पदार्थविकार । उगाचि दिसे भासमात्र । अनन्याचा अन्य [2]प्रकार । तैसी माया ॥२१॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे मायानिरूपणनाम समास दाहावा ॥ १० ॥

---

## ॥ आत्मदशक नाम पंचदश ॥ १५ ॥

### ॥ श्रीराम ॥

अस्तिमांशांचीं शरीरें । त्यांत राहिजे जीवेश्वरें । नाना विकारीं विकारें । प्रविण होइजे[3] ॥ १ ॥ घनवट पोचट स्वभावें । बिवरोन जाणिजे जीवें[4] । व्हावें न व्हावें आघवें । जीव जांणे ॥२॥ येकीं मागमागों घेणें । येकां न मागतांच देणें । प्रचीतीनें सुलक्षणें । वोळखावीं ॥ ३ ॥ जीव जीवांत घालावा । आत्मा आत्म्यांत मिसळावा । राहराहों शोध घ्यावा । परांतरांचों[6] ॥ ४ ॥ जानवें हेंवडकारें जालें । ढिलेपणें हेवडें आलें । नेमस्तपणें शोभलें । दृष्टीपुढें ॥ ५ ॥ तैसेंचि हें मनास मन । विवेकें जावें मिळोन । ढिलेपणें अनुमान । होत आहे ॥ ६ ॥ अनुमानें अनुमान वाढतो । भिडेनें कार्यभाग नासतो । याकारणें प्रत्यये तो । आधीं पाहावा ॥ ७ ॥ दुसऱ्याचे जीवीचें कळेना । परांतर तें

---

१ ज्याला कावीळ होते त्याला पृथ्वी पिवळी दिसते. अशानें सन्निपात ज्याला झाला आहे त्याला विचारलें, त्यालाही तोच अनुभव येतो. २ असावें एक व दिसावें दुसरें. ३ जीवेश्वर मायाविशिष्ट असल्याकारणानें नाना विकार त्याच्या ठिकाणीं असतात. ४ घनवट काय व पोंचट काय हें जीव जाणतोच आहे. ५ पाहिजे किंवा नको हें सर्व जीव जाणतो. ६ दुसऱ्यांच्या अंतःकरणांत शिरून त्यांचें हृद्गत जाणावें. ७ गुंतलेलें. ८ गुंतागुंत, जानवें करतांना तंतु ढिला पडून जी वळी पडते तिला हेवड ह्मणतात.

जाणवेना । वश्य होती लोक नाना । कोण्याप्रकारें ॥ ८ ॥ आकळ सांडून परती । लोक वश्यकर्ण करिती । अपूर्णपणें हलु पडती । ठाईं ठाईं ॥ ९ ॥ जगदीश आहे जगदांतरीं । चेटकें करावीं कोणावरी । जो कोणी विवेकें विवरी । तोचि श्रेष्ठ ॥ १० ॥ श्रेष्ठ कार्यें करी श्रेष्ठ । कृत्रिम करी तो कनिष्ठ । कर्मानुसार प्राणी नष्ट । अथवा भले ॥ ११ ॥ राजे जाती राजपंथें चोर जाती चोरपंथें । वेडें ठके अल्पस्वार्थें । मूर्खपणें ॥ १२ ॥ मूर्खास वाटे मी शाहाणा । परी तो वेडा दैन्यवाणा । नाना चातुर्याच्या खुणा । चतुर जाणे ॥१३॥ जो जगदांतरें मिळाला । तो जगदांतराचि जाला । अत्रीं परत्रीं तयाला । काये उणें ॥ १४ ॥ बुद्धि देणें भगवंताचें । बुद्धिवीण माणुस काचें । राज्यें सांडून फुकाचें । भीक मागे ॥ १५ ॥ जें जें जेथें निर्माण जालें । तें तें तयास मानलें । अभिमानें देऊन गोविलें । ठाईं ठाईं ॥ १६ ॥ आवघेचि ह्मणती आह्मी थोर । आवघेचि ह्मणती आह्मी सुंदर । आवघेचि ह्मणती आह्मी चतुर । भूमंडळीं ॥ १७ ॥ ऐसा विचार आणितां मना । कोणीच लाहान ह्मणवीना । जाणते आणिती अनुमाना । सकळ कांहीं ॥ १८ ॥ आपुलाल्या साभिमानें । लोक चालिले अनुमानें । परंतु हें विवेकानें । पाहिलें पाहिजे ॥ १९ ॥ लटिक्याचा साभिमान घेणें । सत्य आवघेंच सोडणें । मूर्खपणाचीं लक्षणें । ते हे ऐसीं ॥ २० ॥ सत्याचा जो साभिमान । तो जाणावा निराभिमान । न्याये अन्याये समान । कदापी नव्हे ॥२१॥ न्याये ह्मणिजे तो शाश्वत । अन्याये ह्मणिजे तो अशाश्वत । बाष्कळ आणि नेमस्त । येक कैसा ॥ २२ ॥ येक उघड भाग्य भोगिती । येक तस्कर पळोन जाती । येकांची प्रगट महंती । येकांची कानकोंडी ॥ २३ ॥

---

१ अक्कल. २ वशीकरण अपूर्ण झालें ह्मणजे मग थंडावतात, नाद सोडतात. ३ बुद्धीचें राज्य. ४ अभिमान देऊन=अभिमानाच्या योगानें. ५ जाणते जे आहेत ते हें सर्व जाणतात.

आचारविचारेंविण । जें जें करणें तो तो सीण । धूर्त आणि विचक्षण । तेचि शोधावे ॥ २४ ॥ उदंड बाजारी मिळाले । परी ते धूर्तेंचि आ-ळिलें । धूर्तांपासीं कांहीं न चले । बाजाऱ्यांचें ॥ २५ ॥ याकारणें मुख्य मुख्य । तयांसीं करावें सख्य । येणेंकरितां असंख्य । बाजारी मिळती ॥ २६ ॥ धूर्तासि धूर्तचि आवडे । धूर्त धूर्तींच पवाडे । उगेचि हिंडती वेडे । कार्येंविण ॥ २७ ॥ धूर्तासि धूर्तपण कळलें । तेणें मनास मन मिळालें । परी हें गुप्तरूपें केलें । पाहिजे सर्वें ॥ २८ ॥ समर्थाचें राखतां मन । तेथें येती उदंड जन । जन आणि सज्जन । आर्जव करिती ॥ २९ ॥ वोळखीनें वोळखी साधावी । बुद्धीनें बुद्धि बोधावी । नीतिन्यायें वाट रोधावी । पाषांडाची ॥ ३० ॥ वेष धरावा बावळा । अंतरीं असाव्या नाना कळा । सगट लोकांचा जिव्हाळा । मोडूं नये ॥ ३१ ॥ निस्पृह आणि नित्य नूतन[1] । प्रत्ययाचें ब्रह्मज्ञान । प्रगट जाणता सज्जन । दुर्लभ जगीं ॥ ३२ ॥ नाना जिनसपाठांतरें[2] । निवती सकळांचीं अंतरें । चंचळपणें तदनंतरें[3] । सकळा ठाईं ॥ ३३ ॥ येके ठाईं बैसोन राहिला । तरी मग व्यापचि बुडाला । सावधपणें ज्याला त्याला । भेटि द्यावी ॥ ३४ ॥ भेटभेटों उरी राखणें[4] । हे चातुर्याचीं लक्षणें । मनुष्यमात्र उत्तम गुणें । समाधान पावे ॥ ३५ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे चातुर्यलक्षणनाम समास प्रथम ॥ १ ॥

॥ श्रीराम ॥

पृथ्वीमधें मानवी शरीरें । उदंड दाटलीं लाहानथोरें । पालटती मनोविकारें । क्षणक्षणा ॥ १ ॥ जितुक्या मूर्ती तितुक्या प्रकृती । सारिख्या नस्ती आदिअंतीं । नेमचि नाहीं पाहावें किती । काये ह्मणोनी

---

१ निस्पृह असून नित्य नूतन ठिकाणीं हिंडणारा. २ जिन्नस, काव्यांतील उत्तम उत्तम वेंचे. ३ आणि मग एका ठिकाणीं बसून न राहतां सर्वत्र संचार करावा. ४ वारंवार भेटूनही पुन्हा भेटण्याची इच्छा शिल्लक राखणें.

॥ २ ॥ कित्येक म्लेंच होऊन गेले । कित्येक फिरंगणांत आटले । देशभाषानें रुंधिले[1] । कितीयेक ॥ ३ ॥ मऱ्हाष्टदेश थोडा उरला । राजकारणें लोक रुधिला । अवकाश नाहीं जेवायाला । उदंड कामें ॥ ४ ॥ कित्येक युध्यप्रसंगीं गुंतले । तेणें गुणें उन्मत्त जाले । रात्रंदिवस करूं लागले । युध्यचर्चा ॥ ५ ॥ उदिम्यास व्यासंग लागला । अवकाश नाहींसा जाला । अवघा पोटधंदाच लागला । निरंतर ॥ ६ ॥ शडदर्शनें नाना मतें । पाषांडें वाढलीं बहुतें । पृथ्वीमधें जेथतेथें । उपदेसिती ॥ ७ ॥ स्मार्थी आणि वैष्णवीं । उरलीं सुरलीं नेलीं आघवीं । ऐसी पाहातां गथागोवी । उदंड जाली ॥ ८ ॥ कित्येक कामनेचे भक्त । ठाइं ठाइं जाले आसक्त । युक्त अथवा अयुक्त । पाहातो कोण ॥ ९ ॥ या गल्बल्यामधें गल्बला । कोणी कोणी वाढविला । त्यास देखों सकेनासा जाला । वैदिक लोक ॥ १० ॥ त्याहिमधें हरिकीर्तन । तेथें वोढले कित्येक जन । प्रत्ययाचें ब्रह्मज्ञान । कोण पाहे ॥ ११ ॥ याकारणें ज्ञान दुल्लभ । पुण्यें घडे अलभ्य लाभ । विचारवंतां सुल्लभ । सकळ कांहीं ॥ १२ ॥ विचार कळला सांगतां नये[2] । उदंड येती अंतराये[3] । उपाये योजितां अपाये । आडवे येती ॥ १३ ॥ त्याहिमधें जो तिक्ष्ण[4] । रिकामा जाऊं नेदी क्षण । धूर्त तार्किक विचक्षण । सकळां माने ॥ १४ ॥ नाना जिनस उदंड पाठ । वदों लागला घडघडाट । अंव्हाटाचि[5] केली वाट । सामर्थ्यबळें ॥ १५ ॥ प्रबोधशक्तीचीं अनंत द्वारें । जाणें सकळांचीं अंतरें । निरूपणें तदनंतरें । चटक लागे ॥ १६ ॥ मतें मातांतरें सगट । प्रत्यये बोलोन करी सपाट[6] । दंडक सांडून नीट । वेधी जना ॥१७॥ नेमकें भेदकें वचनें । अखंड पाहे प्रसंगमानें । उदास

---

१ कित्येकांचा देशभाषेनें रोध झाला आहे, म्हणजे स्वभाषा विसरून परभाषाप्रवीण झाले आहेत. २ कांहीं अनुभव आला तर तो सांगतां येत नाहीं. ३ विघ्नें. ४ तीक्ष्ण. ५ मोठी, विस्तीर्ण. ६ अनुभवाचें भाषण करून मतें मतांतरें नाहींशीं करितो.

वृत्तीच्या गुमानें । उठोन जातो ॥ १८ ॥ प्रत्यये बोलोन उठोन गेला । चटक लागली लोकांला । नाना मार्ग सांडून त्याला । शरण येती ॥ १९ ॥ परी तो कोठें आडळेना । कोणे स्थळीं सांपडेना । वेष पाहातां हीन दीना । सारिखा दिसे ॥ २० ॥ उदंड करी गुप्तरूपें । भिकाऱ्यासारिखा स्वरूपें । तेथें येशकीर्तिप्रतापें । सीमा सांडिली ॥ २१ ॥ ठाइं ठाइं भजन लावी । आपण तेथून चुकावी । मत्सरमतांची गोवी । लागोंच नेदी ॥ २२ ॥ खंनाळामधें जाऊन राहे । तेथें कोणीच न पाहे । सर्वत्रांची चिंता वाहे । सर्वकाळ ॥ २३ ॥ अवघड स्थळीं कठीण लोक । तेथें राहाणें नेमक । सृष्टीमधें सकळ लोक । धुंडीत येती ॥ २४ ॥ तेथें[२] कोणाचें चालेना । अनुमात्र अनुमानेना । कैंद्र घालून राजकारणा । लोक लावी ॥ २५ ॥ लोकीं लोक वाढविले । तेणें अमर्याद जाले । भूमंडळीं सत्ता चाले । गुप्तरूपें ॥ २६ ॥ ठाइं ठाइं उदंड तांबे । मनुष्यमात्र तितुके झोंबे । चहुंकडे उदंड लांबे । परमार्थबुद्धी ॥ २७ ॥ उपासनेचा गजर । स्थळोस्थळीं थोर थोर । प्रत्ययानें प्राणीमात्र । सोडविले ॥ २८ ॥ ऐसे कैवांड उदंड जाणे । तेणें लोक होती शाहाणे । जेथें तेथें प्रत्यये बाणे । प्राणिमात्रांसी ॥ २९ ॥ ऐसी कीर्ति करून जावें । तरीच संसारास यावें । दास ह्मणे हें स्वभावें । संकेतें बोलिलें ॥ ३० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे निस्पृहव्यापलक्षणनाम समास दुसरा ॥ २ ॥

॥ श्रीराम ॥

मुळापासून सेरावेरा । अवघा पंचीकर्ण पसारा । त्यांत साक्षत्वाचा दोरा । तोहि तत्वरूप ॥ १ ॥ दुरस्ता दाटल्या फौजा । उंच सिंहास-

---

१ खनाळ=कडेकपाट, दुर्गम स्थल. २ त्याच्यापुढें. ३ एकोपा करून. ४ तावा=समुदाय. ५ प्रकार. ६ मूळमायेपासून. ७ जाणिवेचा तंतु. ८ तोहि पंचभूतांतलाच ह्मणजे कूटस्थ आहे.

नीं राजा । याचा विचार समजो । अंतर्यामीं ॥ २ ॥ देहमात्र अस्ति-
मांसाचें । तैसेंचि जाणावें नृपतीचें । मुळापासून सृष्टीचें । तत्वरूप[2] ॥३॥
रायाचे सत्तेनें चालतें । परंतु अवघीं पंचभूतें । मुळीं अधिक जाणीवे-
चें तें । अधिष्ठान [3]आहे ॥ ४ ॥ विवेकें[4] बहुत पैसावले । ह्मणौन अव-
तारी बोलिले[5] । मनु चक्रवती जाले । येणेंचि न्यायें ॥ ५ ॥ जेथें उदं-
ड जाणीव । तेचि तितुके सदेव । थोडे जाणीवेनें [6]नदैव । होती लोक
॥ ६ ॥ व्याप आटोप करिती । धके चपेटे सोसिती । तेणें प्राणी सदे-
व होती । देखतदेखतां ॥ ७ ॥ ऐसें हें आतां वर्ततें । मूर्ख लोकांस
कळेना तें । विवेकी मनुष्य समजतें । सकळ कांहीं ॥ ८ ॥ थोर लाहा-
न बुद्धीपासीं । सगट कळेना लोकांसी । आधीं उपजलें तयासी । थोर
ह्मणती ॥ ९ ॥ वयें धाकुटा नृपती । वृद्ध तयास नमस्कार करिती ।
विचित्र विवेकाची गती । कळली पाहिजे ॥ १० ॥ सामान्य लोकांचें
ज्ञान । तो अवघाच अनुमान । दीक्षादंडकाचें लक्षण । येणेंचि पाडें
॥ ११ ॥ नव्हे कोणास ह्मणावें । सामान्यास काये ठावें । कोणकोणास
ह्मणावें । किती ह्मणूनी ॥ १२ ॥ धाकुटा भाग्यास चढला । तरी
तुछ्य करिती तयाला । याकारणें सलगीच्या लोकांला । दुरी धरावें
॥ १३ ॥ नेमस्त कळेना वचन । नेमस्त नये राजकारण । उगेचि ध-

---

१ दुसरी ओंवी पहिलीचा दृष्टान्त आहे. दुतर्फा फौज असून मध्यभागीं
जसा राजा असावा, तद्वत् पंचीकरणाचा हा जो जगद्रूपी फौजेसारखा पसारा आहे
त्यांत साक्षी हा राजासारखा आहे. २ ज्याप्रमाणें फौज आणि राजा हीं उभयतां
अस्थिमांसाचीं असतात, त्याप्रमाणेंच जगत् आणि साक्षी हीं उभयतां तत्त्वरूप
होत. ३ राज्याच्या सत्तनें फौज चालते किंवा साक्षी हा सर्व जगाला वर्तवितो
तरी पण ते सर्व पंचभूतात्मकच आहेत. मग राजा आणि प्रजा किंवा साक्षी आणि
जगत् यांत फरक कोठें उरला? फरक हाच कीं ज्यांत जास्त जाणीव तो राजा
किंवा साक्षी असतो. ४ ज्ञान, जाणीव. ५ ज्ञान किंवा जाणीव ही अधिक असते
ह्मणून त्यांना अवतारी ह्मणतात. ६ निर्दैव, करंटे. ७ रूढीचें. ८ सामान्य लोक
वृद्धालाच वडिल ह्मणतात, तेव्हां हें बरोबर नाहीं असें कोणकोणाला सांगावें? सा-
मान्य लोकांना काय समजणार आहे?

रिती थोरपण । मूर्खपणें ॥१४॥ नेमस्त कांहींच कळेना । नेमस्त कोणी-
च मानीना । आधीं उपजलें त्या थोरपणा । कोण पुसे ॥ १५ ॥ वडि-
लां वडिलपण नाहीं । धाकुट्यां धाकुटपण नाहीं । ऐसें बोलती त्यांस
नाहीं । शाहाणपण ॥ १६ ॥ गुणेविण वडिलपण । हें तों आवघेंच
अप्रमाण । त्याची प्रचित प्रमाण । थोरपणीं ॥ १७ ॥ तथापि वडिलांस
मानावें । वडिलें वडिलपण जाणावें । नेणतां पुढें कष्टावें । थोरपणीं
॥ १८ ॥ तस्मात् वडिल अंतरात्मा । जेथें चेतला[2] तेथें महिमा । हें तों
प्रगटाचि आहे आह्मा । शब्द नाहीं ॥ १९ ॥ याकारणें कोणीयेकें ।
शाहाणपण सिकावें विवेकें । विवेक न सिकतां तुंकें[3]। तुटोन जाती
॥ २० ॥ तुक तुटलें ह्मणिजे गेलें । जन्मा येऊन काये केलें । बळेंचि
सांदीस घातलें । आपणासी ॥२१॥ सगट बायेका सिव्या देती । सांदीस
पडिला ऐसें ह्मणती । मूर्खपणाची प्राप्ती । ठाकून आली ॥२२॥ ऐसें कोणी-
येकें न करावें । सर्व सार्थकाचि करावें । कळेना तरी विवरावें । ग्रन्थांतरीं
॥ २३ ॥ शाहाण्यास कोणीतरी बाहाती[4] । मूर्खास लोक दवडून देती ।
जीवास आवडे संपत्ति । तरी शाहाणे व्हावें ॥ २४ ॥ आहो या शा-
हाणपणाकारणें । बहुतांचें कष्ट करणें । परंतु शाहाणपण सिकणें । हें
उत्तमोत्तम ॥ २५ ॥ जो बहुतांस मानला । तो जाणावा शाहाणा
जाला । जनीं शाहाण्या मनुष्याला । काये उणें ॥ २६ ॥ आपलें हित
न करी लोकिकीं । तो जाणावा आत्मघातकी । या मूर्खायेवढा पातकी ।
आणिक नाहीं ॥२७॥ आपण संसारीं कष्टतो । लोकांकरवीं रागेजोन घेतो ।
जनामधें शाहाणा तो । ऐसें न करी ॥२८॥ साधकां सिकविलें स्वभावें ।
मानेल तरी सुखें घ्यावें । मानेना तरी सांडावें । येकिकडे ॥२९॥ तुम्ही

---

१ वयानें धाकटा पण ज्ञानवान्, वयानें वृद्ध अशा मनुष्यास ज्ञानाच्या गोष्टी सांगूं लागला तर वृद्ध मनुष्य लागलींच ह्मणतो कीं "आतां वडिलांना वडिलपण व धाकट्यांना धाकटेपण उरलें नाहीं" पण असें ह्मणणारे मूर्ख समजावे. २ प्रगट झाला, प्रकाशित झाला. ३ वजन, मर्यादा. ४ बोलावतात.

श्रोते परम दक्ष । अलक्षास लावितां लक्ष । हें तां सामान्य प्रत्यक्ष । जाणतसा ॥ ३० ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे श्रेष्ठअंतरात्मा-निरूपणनाम समास तृतीय ॥ ३ ॥

॥ श्रीराम ॥

पृथ्वीपासून जालीं झाडें । झाडापासून होतीं लांकडें । लांकडें भस्मोन पुढें पृथ्वीच होये ॥ १ ॥ पृथ्वीपासून वेल होती । नाना जिनस फापावती । वाळोन कुजोन मागुती । पृथ्वीच होये ॥ २ ॥ नाना धान्यांचीं नाना अन्नें । मनुष्यें करिती भोजनें । नाना विष्ठा नाना वमनें । पृथ्वीच होये ॥ ३ ॥ नाना पक्षादिकीं भक्षिलें । तरी पुढें तैसेंचि जालें । वाळोन भस्म होऊन गेलें । पुन्हा पृथ्वी ॥ ४ ॥ मनुष्यें मरतांच ऐका । क्रिमि[1] भस्म कां मृत्तिका । ऐशा काया पडती अनेका । पुढें पृथ्वी ॥ ५ ॥ नाना तृणें पदार्थ कुजती । पुढें त्याची होये माती । नाना किडे मरोन जाती । पुढें पृथ्वी ॥ ६ ॥ पदार्थ दाटले अपार । किती सांगावा विस्तार । पृथ्वीवांचून थार । कोणास आहे ॥ ७ ॥ झाड पाले आणि तृण । पशु भक्षितां होतें सेण । खात मूत भस्म मिळोन । पुन्हा पृथ्वी ॥ ८ ॥ उत्पत्तिस्थितिसंव्हारतें । तें तें पृथ्वीस मिळोन जातें । जितुकें होतें आणि जातें । पुन्हा पृथ्वी । ॥ ९ ॥ नाना बीजांचिया रासी । विरढोनें[2] लागती गगनासी । पुढें सेवटीं पृथ्वीसी । मिळोन जाती ॥ १० ॥ लोक नाना धातु पुरिती । बहुतां दिवसां होये माती । सूवर्णपाषाणाची गती । तैसीच आहे ॥ ११ ॥ मातीचें होतें सुवर्ण । आणी मृत्तिकेचे होती पाषाण । माहा अग्निसंगें भस्मोन । पृथ्वीच होये ॥ १२ ॥ सुवर्णाचें जर होतें । जर सेवटीं कुजोन जातें । रस होऊन वितुळतें । पुन्हा पृथ्वी ॥ १३ ॥ पृथ्वीपासून धातु निपजती । अग्निसंगें रैस[3] होती ।

---

१ कृमी. २ विरुढणें=अंकुर येणें, उंच वाढणें. ३ प्रथम "भस्म" होतें त्याचें "रस" केलें आहे.

तया रसाची होये जगती । कठीणरूपें ॥ १४ ॥ नाना जळासीं गंधी सुटे । तेथें पृथ्वीचें रूप प्रगटे । दिवसेंदिवस जळ आटे । पुढें पृथ्वी ॥ १५ ॥ पत्रें पुष्पें फळें येती । नाना जीव खाऊन जाती । ते जीव । मरतां जगती । नेमस्त होये ॥ १६ ॥ जितुका कांहीं जाला आकार । तितुक्यास पृथ्वीचा आधार । होती जाती प्राणीमात्र । सेवट पृथ्वी ॥ १७ ॥ हें किती ह्मणौन सांगावें । विवेकें आवघेंचि जाणावें । खांज-णीभांजणीचें समजावें । मूळ तैसें ॥ १८ ॥ आप आळोन पृथ्वी जाली । पुन्हां आपींच विराली । अग्नियोगें भस्म जाली । ह्मणोनियां ॥ १९ ॥ आप जालें तेजापासूनी । पुढें तेजें घेतलें सोखुनी । तें तेज जालें वायोचेनी । पुढें वायो झडपी ॥ २० ॥ वायो गगनीं निर्माण जाला । पुढें गगनींच विराला । ऐसें खांजणीभांजणीला । बरें पाहा ॥ २१ ॥ जें जें जेथें निर्माण होतें । तें तें तेथें लया जातें । येणें रिती पंचभूतें । नाश पावती ॥ २२ ॥ भूत ह्मणिजे निर्माण जालें । पुन्हां मागुतें निमालें । पुढें शाश्वत उरलें । परब्रह्म तें ॥ २३ ॥ तें परब्रह्म जों कळेना । तों जन्ममृत्य चुकेना । चत्वार खाणी जीव नाना । होणें घडे ॥२४॥ जडाचें मूळ तें चंचळ । चंचळाचें मूळ तें निश्चळ । निश्चळासी नाहीं मूळ । बरें पाहा ॥ २५ ॥ पूर्वपक्ष ह्मणिजे जालें । सिद्धांत ह्मणिजे निमालें । पक्षातीत जें संचलें । परब्रह्म तें ॥ २६ ॥ हें प्रचितीनें जाणावें । विचारें खुणेसी बाणावें । विचारेंविण सिणावें । तेंचि मूर्खपण ॥ २७ ॥ ज्ञानी भिडेनें दडपला । निश्चळ परब्रह्म कैंचें त्याला । उगाच करितो गल्बला । मायेमधें ॥ २८ ॥ माया निशेष नासली । पुढें स्थिति कैसी उरली । विचक्षणें विवरिली । पाहिजे स्वयें ॥ २९ ॥ निशेष मायेचें निरशन । होतां आत्मनिवेदन । वाच्यांश नाहीं विज्ञान । कैसें जाणावें ॥ ३० ॥ लोकांचे बोलीं जो लागला ।

---

१ बेरीजवजाबाकी, उभारणीसंव्हारणी. २ शोषून. ३ जगत् झालें आहे, तें सत्य आहे हा पूर्वपक्ष. तें नाहींसें झालें, तें मिथ्या आहे हा सिद्धान्त.

तो अनुमानेंच बुडाला । याकारणें प्रत्ययाला । पाहिलेंच पाहावें ॥२१॥
इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे शाश्वतब्रह्मनिरूपणनाम समास चतुर्थ ॥ ४ ॥

॥ श्रीराम ॥

दोघां[1] ऐसीं तीन[2] चालती[3] । अगुणीं[4] अष्टधा प्रकृती । अधोर्ध[5] सांडून[6] वर्तती । इंद्रफणी[7] ऐसीं ॥ १ ॥ पणतोंडें[8] भक्षितो पणजा । मूळ बापास मारी वोजा[9] । चुकाऱ्या गेला राजा । चौघां[10] जणांचा ॥ २ ॥ देवें[11] देवोंळयामधें[12] लपाला । देऊळ पूजितां पावे त्याला । सृष्टिमधें ज्याला त्याला । ऐसेंचि आहे ॥ ३ ॥ दोनी नांमें[13] येकास पडिलीं । लोकीं ने-

---

१ प्रकृति+पुरुष. २ त्रिगुण. ३ प्रकृतिपुरुष ह्मणजे मूळमाया, तिच्या अनुसरणानें त्रिगुण चालतात. मूळमायेपासून झालेली गुणमाया ही मूळमायेच्या अनुसंधानानें चालते. ४ मूळ प्रतींत 'णी' वर अनुस्वार नाहीं; त्यामुळें गुणरहित जी माया तीच अष्टधा प्रकृति असा अर्थ होतो. परंतु 'णी' वर अनुस्वार कल्पिला तर निर्गुणाच्या ठिकाणीं माया उत्पन्न झाली असा अर्थ होतो. ५ अधोर्ध्व; खालीं, वर. ६ खालीं ह्मणतां येत नाहीं व वर ह्मणतां येत नाहीं, तर अंतरिक्षांत अष्टधा प्रकृतीचा वास आहे. ७ इंद्रधनुष्याप्रमाणें. ८ आकाश–वायु–तेज–आप–पृथ्वी अशी वंशावळ आहे. तेव्हां पृथ्वीचा पणजा वायु होतो. पणजा जो वायु तो पतवंड जी पृथ्वी तिचें भक्षण करितो, ह्मणजे पृथ्वी वायूंत लीन होते, असा या चरणाचा अर्थ कोणी कोणी करितात; परंतु श्रीकल्याणमहाराजांच्या मठांतील एका जुन्या बाडांत पुढील मजकूर आहेः—"वनस्पती आदिकरून पदार्थ हे पणतु, पृथ्वी बाप, उदक आजा व पणजा अग्नि." यावरून वनस्पती आदिकरून पदार्थांचें भक्षण अग्नि करितो असा अर्थ होतो. ९ वोजा=चातुर्यानें. वर दिलेल्या वंशावळींतील कोणतेंही मूल आपल्या बापास सिताफीनें मारितें; जसें पृथ्वी उदकाला शोषून घेते, उदक तेजाला विझवितें. (?) १० पृथ्वी, आप, तेज, वायु या चौघांचा राजा जो आकाश ह्मणजे अंतरात्मा तो चुकून गेला आहे, आढळत नाहीं. ११ अंतरात्मा. १२ देहामध्यें. १३ प्रकृति व पुरुष हीं दोन नांवें कल्पिलेलीं आहेत, परंतु वस्तुतः दोन्हीं नांवें एका मायेचींच आहेत.

मस्त कल्पिलीं । विवेकें प्रत्ययें पाहिलीं । तों येकचि नाम ॥ ४ ॥ नाहीं पुरुष ना वनिता । लोकीं कल्पिलें[2] तत्वता । त्याचा बरा शोध घेतां । कांहींच नाहीं ॥ ५ ॥ स्त्री नदी पुरुष खळाळ । ऐसें बोलती सकळ । विचार पाहातां निवळ । देह[3] नाहीं ॥ ६ ॥ आपण आपणास कळेना । पाहों जातां आकळेना । काशास कांहींच मिळेना । उदंडपणें ॥ ७ ॥ येकलाचि उदंड जाला । उदंडचि येकला पडिला । आपणासि आपला गल्बला । सोसवेना[4] ॥ ८ ॥ येक असोन फुटी पडिली । फुटी असोन स्थिति येकली । विचित्र कळा पैसावली । प्राणिमात्रीं ॥ ९ ॥ वल्लीमधें जळ संचरे । कोरडेपणें[6] हें वावरे । वोलेवांचून न थिरे । कांहीं केल्यां ॥ १० ॥ झाडांमधें केलीं आळीं । झाडें धांवती निराळीं । कित्येक झाडें अंतराळीं । उडोन जाती ॥ ११ ॥ भूमीपासून वेगळीं जालीं । परी ते नाहींत वाळलीं । निराळींच वळावलीं । जेथतेथें ॥ १२ ॥ देवाकरितां चालती झाडें । देव नस्तां होती लांकडें । नीटचि आहे कुंवाडें । सर्वथा नव्हे ॥ १३ ॥ झाडांपासून झाडें होती । तेहि अंतरीक्ष जाती । मुळानें भेदिली जगती । कदापी नाहीं ॥१४॥

---

१ प्रकृति ह्मणजे कोणी स्त्री व पुरुष ह्मणजे कोणी पुल्लिंगी देह असा मुळींच भेद नाहीं. २ ही केवळ लोकांनीं कल्पना केलेली आहे. ३ नदीला स्त्रीनाम दिलें आहे व खळाळाला पुरुषनाम दिलें आहे, ह्मणून नदी व खळाळ यांच्या ठिकाणीं कांहीं स्त्रीपुरुषांचा देह आहे असें मुळींच नाहीं; उभयतां मिळून केवळ पाणीच आहे. ४ आधीं उपाधी त्यानेंच ( ब्रह्मानें ) केली व तिचा त्याला कंटाळा आला, असा अर्थ; किंवा आपण वास्तविक ब्रह्मस्वरूप असूनही घोंटाळ्यांत पडलों आहोंत आणि तेणेंकरून आपणास उपाधी सहन करवत नाहीं, असा अर्थ. ५ चैतन्य एक असून भिन्न दिसत आहे; तें भिन्न जरी दिसत आहे तरी एकच आहे. ६ वल्लीमध्यें जळ असतें तें दिसत नाहीं ह्मणून कोरडेपणें ह्मटलें आहे. ७ खरीं झाडें जशीं आळ्यामध्येंच राहतात तशीं देहरूपी झाडें राहत नाहींत. पक्ष्यादिकांचीं देहरूपी झाडें आकाशांत उडतात. ८ अंतरात्म्याच्या योगानें. ९ ही गोष्ट सरळ आहे यांत कोडें कांहींच नाहीं. १० हीं जीं देहरूपी झाडें आहेत त्यांच्या मुळ्या जमिनींत मुळींच जात नाहींत.

झाडांस झाडें खातपाणी । घालून पाळिलीं प्रतिदिनीं । बोलकीं झाडें शब्दमथनीं । विचार वेती[1] ॥ १५ ॥ होणार तितुकें आधींच जालें । मग कल्पकल्पून बोलिलें[2] । जाणतयासी समजलें । सकळ कांहीं ॥ १६ ॥ समजलें तरी उमजेना । उमजलें तरी समजेना । प्रत्ययेंविण अनुमानेना । सकळ कांहीं ॥ १७ ॥ सर्वत्रांचा वडिल कोणँ । हेचि पाहावी वोळखण । भेटे आपणास आपण । जगदांतरें ॥ १८ ॥ अंतरनिष्ठांची उंच कोटी । बाहेरींमुद्राची संगती खोटी । मूर्ख काये समजेल गोष्टी । शाहाणे जाणती ॥ १९ ॥ अंतरें राखतां राजी । भलत्यास भलताच नेवाजी । अंतरें न राखतां भाजी । मिळणार नाहीं ॥ २० ॥ ऐसें वर्ततें प्रत्यक्ष । अलक्षीं लावावें लक्ष । दक्षास भेटतां दक्ष । समाधान होतें ॥ २१ ॥ मनास मिळतां मनँ । पाहोन येती निरंजनं । चंचळचक्र उलंघून । पैलाड जाती ॥ २२ ॥ येकदा जाऊन पाहोन आले । मग तें सन्निधें देखिलें । चर्मचक्षीं लक्षिलें । न वचे कदा ॥ २३ ॥ नाना शरीरीं चंचंळ । अखंड करी चळवळ । परब्रह्म तें निश्चळ । सर्वांठाईं ॥ २४ ॥ चंचळ धांवे येकीकडे । वोस पडे दुसरेकडे । चंचळ [11]पुरे सर्वांकडे । हें तों घडेना ॥ २५ ॥ चंचळ चंचळास पुरेना । आवघें चंचळ विवरेना । निश्चळ अपार अनुमाना । कैसें येतें ॥ २६ ॥ गगनीं चालिली [12]हेंवावी । कैसी पावेल पार पदवी । जातां मधेंचि विझावी । हा स्वभावचि तिचा ॥ २७ ॥ मनोर्धम येक-

---

१ हीं झाडें बोलकीं असून शब्दांचें मंथन करून परस्परांस आपआपला भाव व्यक्त करितात. २ जगत् हें आधींच झालेलें आहे; नंतर सांगणारांनीं आपआपल्यापरी कल्पना करून त्याची उत्पत्ति सांगितली. ३ द. १५ ३/१६ पहा. ४ जे बहिर्मुख असतात ते; ज्यांचीं इंद्रियें अंतर्मुख झालीं नाहींत ते; जे अंतरात्म्याचा कधींच विचार करीत नाहींत ते. ५ नांवाजतो. ६ भाजीसारखा अल्प पदार्थ देखील. ७ मीतूंपण नाहींसें झालें ह्मणजे, अंतरात्मा एकच आहे हें समजलें ह्मणजे गुरुशिष्याचा ऐक्यभाव झाला ह्मणजे. ८ परब्रह्म. ९ हृदयांत किंवा सर्वत्र. १० जीव किंवा माया. ११ पुरें पडतें. १२ बाण.

देसी । कैसा आकळिल वस्तुसी । निर्गुण सांडून अपेसी । सर्व ब्रह्म ह्मणे ॥ २८ ॥ नाहीं सारासार विचार । तेथें अवघा अंधकार । खरें सांडून खोटें पोर । नेणतें घेतें ॥ २९ ॥ ब्रह्मांडाचें माहाकारणें । तेथून हें पंचीकर्ण । माहावाक्याचें विवर्ण । वेगळें असे ॥ ३० ॥ महत्तत्व महद्भूत । तोचि जाणावा भगवंत । उपासना हे समाप्त । येथून जाली ॥ ३१ ॥ कर्म उपासना आणि ज्ञान । त्रिकांड वेद हें प्रमाण । ज्ञानाचें होतें विज्ञान । परब्रह्मीं ॥ ३२ ॥ इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे चंचळलक्षणनिरूपणनाम समास पंचम ॥ ५ ॥

॥ श्रीराम ॥

पीतांपासून कृष्ण जालें । भूमंडळीं विस्तारलें । तेणेंविण उमजलें । हें तों घडेना ॥ १ ॥ आहे तरी स्वल्प लक्षण । सर्वत्रांची सांठवण । अद्धम आणी उत्तम गुण । तेथेंचि असती ॥ २ ॥ महीसुतें सरसाविला । सरसाऊन द्विधा केला । उभयेता मिळोन चालिला । कार्यभाग ॥ ३ ॥ स्वेतास्वेतांस गांठी पडतां । मधें कृष्ण मिश्रित होतां । इहलोकसार्थकता । होत आहे ॥ ४ ॥ विवरतां याचा विचार । मूर्ख तोचि होये चतुर । सद्यप्रचित साक्षात्कार । परलोकींचा ॥ ५ ॥ सकळांस जें मान्य । तेंचि होतसे सामान्य । सामान्यास अनन्य । होइजेत नाहीं ॥ ६ ॥ उत्तम

१ अपयशी. २ मूळमाया. ३ महत्तत्व ह्मणजेच महद्भूत. तोच भगवंत. ‘एको विष्णुर्महद्भूतम्’. ४ उपासनेच्या ठिकाणीं द्वैताची अपेक्षा असते व महत्तत्वापलीकडे द्वैत उरत नाहीं, ह्मणून उपासना ही महत्तत्वापाशीं समाप्त होते, पुढें जात नाहीं. ५ दिवा. ६ काजळी. ७ काजळी नसती तर पोथ्या नसत्या; वेदपुराणादि ग्रन्थ नसते तर ज्ञान झालें नसतें; तेव्हां सर्वत्र ज्ञानप्रसार होण्यास ही काजळीच कारण आहे. ८ कृष्णावांचून. ९ बोरू. १० श्वेताश्वेत=श्वेत+अश्वेत=कागद+काळा बोरू. ११ लोक साराला असार समजतात व असाराला सार समजून असार मान्य करितात.

मध्यम कनिष्ठ रेखा । अदृष्टीची गुप्त रेखा । चत्वार अनुभव सारिखा । होत नाहीं ॥ ७ ॥ चौदा पीढ्याचे पैवाडे । सांगती ते शाहाणे कीं वेडे । ऐकत्यानें वडे किं न वडे । ऐसें पाहावें ॥ ८ ॥ रेखा तितुकी पुसोन जाते । प्रत्यक्ष प्रत्यया येतें । डोळेझांकणी करावी ते । कायेनिमित्य ॥ ९ ॥ बहुतांचे बोलीं लागले । ते प्राणी अनुमानीं बुडाले । मुख्य निश्चये चुकले । प्रत्ययाचा ॥ १० ॥ उदंडाचें उदंड ऐकावें । परी तें प्रत्ययें पाहावें । खरेंखोटें निवडावें । अंतर्यामीं ॥ ११ ॥ कोणासी नव्हे ह्मणों नये । समजावे अपाये उपाये । प्रत्यये ध्यावा बहुत काये । बोलोनियां ॥ १२ ॥ माणुस हेंकाड आणी कच्चें । मान्य करावें तयाचें । येणेंप्रकारें बहुतांचें । अंतर राखावें ॥ १३ ॥ अंतरीं पीळ पेच वळसा । तोचि वाढवी बहुवसा । तरी मग शाहाणा कैसा । निवऊं नेणे[7] ॥ १४ ॥ वेडे करावें शाहाणे । तरीच जिणें श्लाध्यवाणें । उगेंच वादांग वाढवणें । हें मूर्खपण ॥ १५ ॥ मिळोन जाऊन मेळवावे । पडी घेऊन उलथावे । कांहींच कळों नेदावें । विवेकबळें ॥ १६ ॥ दुसऱ्याचे चालणीं चालावें । दुसऱ्याचें बोलणीं बोलावें । दुसऱ्याचे मनोगतें जावें । मिळोनियां ॥ १७ ॥ जो दुसऱ्याच्या हितावरी । तो विर्पट कहिंच न करी । मानत मानत विवरी । अंतर तयाचें ॥ १८ ॥ आधीं अंतर हातीं घ्यावें । मग हळुहळु उकलावें । नाना उपायें न्यावें । परलोकासी ॥ १९ ॥ हेंकाडास हेंकाड मिळाला । तेथें गल्बलाचि जाला । कळहो उठतां च्यातुर्याला । ठाव कैंचा

---

१ ललाटरेखा. २ चौघांचें नशीब कांहीं एकसारखें नसतें; कोणाची ललाटरेखा उत्तम, कोणाची मध्यम व कोणाची कनिष्ठ असते. ३ पिढ्यांचे. ४ कीर्ति. ५ पूर्वजांची नुसती कीर्ति वर्णन करितात ते वेडेच ह्मणावयाचे. हल्लीं आपल्या हातून कांहीं होत आहे कां नाहीं याचा श्रोत्यानें विचार करावा. ६ सर्व रेषा पुसतां येतात ही जर गोष्ट खरी आहे तर ललाटरेषा पुसतां येणार नाहीं असें, डोळे मिटून कां खरें मानावें. ७ आपल्या मनांतला पीळ जर वाढविला तर मग तो कसला शाहाणा, त्याला लोकांचें समाधान करितां येणार नाहीं. ८ वितुष्ट, वाईट.

